शैक्षणिक वर्ष २०२२-२३
नवीन महाविद्यालयास अंतिम मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः न्यायाप्र-२०२१/प्र.क्र.८८/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ मे, २०२३.

**संदर्भ -** १. शासन निर्णय क्र. एनजीसी-२०१७/(२९/१७)/मशि-४, दि. १५.०९.२०१७.
२. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे याचिका क्र. १५८८/२०२१ मधील दि. ०७.०६.२०२२ चे आदेश.

## शासन आदेश

अश्वमेध बहुउद्देशिय शैक्षणिक व सामाजिक संस्थेचे जिजामाता महिला महाविद्यालय, दत्तनगर, उस्मानाबाद या महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२०-२१ मध्ये अंतिम मान्यता नामंजूर केल्यामुळे संबंधित संस्थेने मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे याचिका क्र. १५८८/२०२१ दाखल केलेली आहे. प्रस्तुत प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दिनांक ०७.०६.२०२२ रोजी सुनावणी झाली असता मा. न्यायालयाने खालीलप्रमाणे आदेश दिलेले आहेत.

In view of the above, this petition is partly allowed. The impugned order dated 20.08.2020 stands quashed and set aside and the petitioner’s proposal dated 25.02.2019 to start the Women’s Senior College of Commerce at Osmanabad, stands granted from the academic year 2022-2023. Needless to state, appropriate steps by the respondents shall be initiated so as to facilitate the commencement of the educational curriculum in the said new college from the academic year 2022-2023.

मा. उच्च न्यायालयाने उपरोक्त आदेशात याचिकादार संस्थेच्या नवीन महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२२-२३ करीता अंतिम मान्यता मंजूर करणेबाबत आदेशित केले होते.

मा. उच्च न्यायालयाने दिनांक ०७.०६.२०२२ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने याचिकादार संस्थेच्या नवीन महाविद्यालयास खालील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (छ) मधील तरतुदीनुसार शैक्षणिक वर्ष २०२२-२०२३ पासून खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाच्या **कायम विनाअनुदान तत्वावरील** या प्रचलित धोरणानुसार अंतिम मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| | **एस.एन.डी.टी. विद्यापीठ, मुंबई** | |
| **अ.क्र.** | **संस्थेचे व महाविद्यालयाचे नाव** | **विद्याशाखा** |
| १. | अश्वमेध बहुउद्देशिय शैक्षणिक व सामाजिक संस्थेचे जिजामाता महिला महाविद्यालय, गट नं. १०२, प्लॉट नं. १३, दत्त नगर, एम.आय.डी.सी. रोड, आशा भारत गॅस बाजुला, जि. उस्मानाबाद-४१३ ५०१ | बी.कॉम. |

**२. अटी व शर्ती :-**

१. सदर महाविद्यालयाची मान्यता ही शासनाच्या प्रचलित धोरणानुसार **कायम विनाअनुदानित तत्वावर** राहील. तसेच सदर महाविद्यालयाच्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन व वेतनेतर दायित्व शासनावर असणार नाही.

२. नवीन महाविद्यालय / संस्थेने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु.१००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टॅम्प पेपरवर सादर करावे.

३. महाविद्यालये/ संस्थेने हमीपत्र सादर केल्याशिवाय आणि तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रीया सुरु करु नये.

४. महाविद्यालयाने संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक / कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. ३ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

५. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

६. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन, २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

७. मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयाने सक्षम प्राधिकरणाने विहीत केलेल्याकालमर्यादेत नॅक मुल्यांकन करुन घेण्यासाठी प्रयत्न करावा व याबाबत पाठपुरावा करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठाची राहील.

८. ज्या शैक्षणिक वर्षासाठी महाविद्यालय सुरु करण्यास परवानगी देण्यात आलेली आहे, त्या शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे आवश्यक आहे. संलग्निकरण किंवा इतर शिखर संस्था/ केंद्रीय नियामक मंडळे यांची परवानगी मिळण्यास विलंब झाल्यामुळे जर महाविद्यालय त्या शैक्षणिक वर्षात सुरु होऊ शकले नाही तर, त्या शैक्षणिक वर्षांच्या पुढील

शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे अनिवार्य राहील. अन्यथा दिलेली परवानगी आपोआप रद्द समजण्यात येईल.

९. संबंधित विद्यापीठाने संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी शासन मान्यता आदेशांचे अवलोकन केल्याशिवाय व संबंधित विभागीय सहसंचालकाचे अट क्रमांक ३ मधील प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

१०. संबंधित विद्यापीठाने व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या नवीन महाविद्यालयांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर महाविद्यालयांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर महाविद्यालयांची मान्यता रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०५२५१६२४३६३५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2023.05.25 16:27:26 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. कुलसचिव, एस.एन.डी.टी. विद्यापीठ, मुंबई.
७. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
८. संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत)
९. निवडनस्ती (मशि-४).